| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | (गट-ड, आरोग्य सेवा) | | कार्यकर्ता ई. म्हणून अनुभव असणा-यास प्राधान्य. |
| ७४ | आया / दाया (गट-ड, आरोग्य सेवा) | नामनिर्देशन / सरळसेवा-१००% | १. इयत्ता सातवी परिक्षा उतीर्ण.<br>२. स्त्री उमेदवारातुन आया व दाया म्हणून दवाखान्यात काम करणा-या महिलांना कामाचा अनुभव असणा-यास प्राधान्य. |
| **१४.अनधिकृत बांधकाम नियंत्रण व निमुर्लन विभाग** | | | |
| ७५ | अनधिकृत बांधकाम नियंत्रण व निमुर्लन अधिकारी (गट-अ, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती १००% | १. नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कमीत कमी ८ ते १० विभागात कार्यालयीन अधिक्षक या पदाचा किमान ५ वर्षाचा प्रभारी अनुभव असणाऱ्या, तसेच लिपिक संवर्गात किमान २० वर्षाचा अनुभव असणाऱ्या, कर्मचाऱ्यांमधून सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>२. मान्यता प्राप्त विद्यापीठाची पदवी, ड्रॉफ्समन सिव्हील आरेखक (२) वर्षाचा पाठयक्रम पुर्ण., तसेच एखादया विशिष्ट अभ्यासक्रमात पदवी संपादित करणाऱ्या कर्मचाऱ्यास प्राधान्य देण्यात येईल. |
| **१५.पशूसंवर्धन विभाग** | | | |
| ७६ | पशु शल्य चिकित्सक (गट-अ पशु संवर्धन आरोग्य सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा-१००% | १. मान्यताप्राप्त विद्यापीठाची पशुवैद्यकीय शास्त्रातील पदव्युत्तर पदवी.<br>२. पशुवैद्यकीय अधिकारी/ पशु शल्य चिकित्सक म्हणून शासकीय/ निमशासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्थामध्ये किंवा मोठ्या खाजगी आस्थापनेमधील किमान ०३ वर्षाचा अनुभव आवश्यक. |
| | | प्रतिनियुक्ती | नामनिर्देशन/ सरळसेवेने उमेदवार उपलब्ध न झाल्यास राज्य शासनाच्या पशुसंवर्धन |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | विभागातील समकक्ष अधिका-यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ७७ | पशुधन पर्यवेक्षक (गट-अ पशु संवर्धन आरोग्य सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा-१००% | १. मान्यताप्राप्त विद्यापीठाची पशुवैद्यकीय शास्त्रातील पदवी/ पदविका.<br>२. पशुवैद्यकीय शास्त्रातील पदव्युत्तर पदवीधारकास प्राधान्य.<br>३. संबंधीत कामाचा तीन वर्षाचा अनुभव. |
| | | प्रतिनियुक्ती | नामनिर्देशन/ सरळसेवेने उमेदवार उपलब्ध न झाल्यास राज्य शासनाच्या पशुसंवर्धन विभागातील समकक्ष कर्मचाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| **१६.घनकचरा व्यवस्थापन व स्वच्छता विभाग** | | | |
| ७८ | मुख्य स्वच्छता अधिकारी (गट-ब, सार्वजनिक आरोग्य सेवा) | पदोन्नती १००% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अधिक्षक (प्रशासकीय संवर्ग) / स्वच्छता अधिकारी या पदावर किमान ३ वर्षांची सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ७९ | स्वच्छता अधिकारी (गट-ब, सार्वजनिक आरोग्य सेवा) | पदोन्नती-१००% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील स्वच्छता निरीक्षक या पदावर किमान ३ वर्षांची सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्यांमधून सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ८० | स्वच्छता निरीक्षक (गट-ब, सार्वजनिक आरोग्य सेवा) | नामनिर्देशन-५०% | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी<br>ब) स्वच्छता निरिक्षक पदविका पूर्ण असणे आवश्यक.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| | | पदोन्नती-५०% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहाय्यक स्वच्छता निरीक्षक या |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | पदावर किमान ३ वर्षांची सेवा पूर्ण झालेल्या, तसेच महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील वर्ग-३ व ४ संवर्गातील जे कर्मचारी नामनिर्देशनाची विहित अर्हता पूर्ण करतील, अशा कर्मचाऱ्यांमधून सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल |
| ८१ | सहाय्यक स्वच्छता निरीक्षक (गट-क, सार्वजनिक आरोग्य सेवा) | पदोन्नती-१००% | १. नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सफाई कामगार या पदावर किमान ३ वर्षांची सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्यांमधून सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>२.उच्च माध्यमिक शालांत परिक्षा एच.एस.सी उत्तीर्ण, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्थेकडील स्वच्छता निरिक्षक अभ्यासक्रम उत्तीर्ण, एम.एस.सी.आय.टी किंवा तत्सम परिक्षा उत्तीर्ण, मान्यता प्राप्त संस्थेकडील एल.एस.जी.डी./ एल.जी.एस. परिक्षा उत्तीर्ण कर्मचाऱ्यास प्राधान्य देण्यात येईल. |
| ८२ | सफाई कामगार (गट-ड, सार्वजनिक आरोग्य सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा १००% | १. चौथी उतीर्ण.<br>२. मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| | | **१७.अग्निशमन विभाग** | |
| ८३ | मुख्य अग्निशमन अधिकारी (गट-अ, अग्निशमन सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा १००% | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी.<br>ब) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांच्याकडील पदवी (बी.ई.फायर) धारण केलेली असावी किंवा<br>१) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांच्याकडील सबऑफीसरचा पाठ्यक्रम पूर्ण केलेला असावा. |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | २) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांच्याकडील Station Officer & Instructor पाठ्यक्रम उत्तीर्ण असावा.<br>३) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांच्याकडील डिवीजनल फायर ऑफीसर पाठ्यक्रम उत्तीर्ण असावा किंवा १) The Institution of Fire Engineers (U.K.) किंवा (India) या संस्थेकडील सदस्यत्व (एमआय फायर) किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर The Institution of Fire Engineers (U.K.) यांचे सदस्यत्व प्राप्त केलेले असावे.<br>४) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>५) एमएच सीआयटी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>६) जड वाहन चालविण्याचा परवाना असावा.<br>**क) शारीरिक पात्रता:-**<br>१) उमेदवाराचे वय ५५ वर्षांपेक्षा जास्त असू नये.<br>२) अग्निशमन सेवेत प्रशासकीय व ऑपरेशन कामासाठी उमेदवाराचे निरोगी व सुदृढ शरीरयष्टी असावी.<br>**अनुभव -**<br>अ,ब,क,ड वर्ग महापालिकेतील उपअग्निशमन अधिकारी या पदावर किमान दोन वर्ष सेवा पूर्ण केलेली असावी किंवा ड वर्ग महापालिका/ अ वर्ग नगरपरिषद / विशेष नियोजन प्राधिकरण / शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये उपमुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान तीन वर्ष सेवा पूर्ण केलेली असावी. |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | प्रतिनियुक्ती | पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध होत नसल्यास, सदर अधिकारी उपलब्ध होईपर्यंत, केंद्र/राज्य/ निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या सेवेतील समकक्ष पद किमान ३ वर्षे धारण करणाऱ्या अग्निशमन सेवेतील अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीच्या धोरणानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ८४ | उप मुख्य अग्निशमन अधिकारी<br>(गट-ब, अग्निशमन सेवा) | पदोन्नती-१००% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>पदोन्नतीने उमेदवार उपलब्ध न झाल्यास नामनिर्देशनाने घेता येईल<br>अर्हता -<br>अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी उत्तीर्ण<br>ब)राष्ट्रीय अग्निशिमन सेवा महाविद्यालय, नागपूर येथून B.E.Fire Engg. उत्तीर्ण किंवा राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचेकडील Divisional Fire Officer पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकीमधील प्रगत पदविका) किंवा The Institution of Fire Engineers (U.K.) किंवा (India) या संस्थेकडील सदस्यत्व (M.I.Fire) किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर (The Institution of Fire Engineers (U.K.) यांचे सदस्यत्व प्राप्त करणे आवश्यक<br>क)अग्निशमन दलातील सहायक अग्निशमन अधिकारी म्हणून ३ वर्षाचा अनुभव. |
| ८५ | अग्निशमन केंद्र अधिकारी<br>(गट-ब अग्निशमन सेवा) | पदोन्नती-१००% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उप अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान ३ वर्षांची सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी धारण |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>पदोन्नतीने उमेदवार उपलब्ध न झाल्यास नामनिर्देशनाने घेता येईल<br>अर्हता -<br>अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी उत्तीर्ण<br>ब)राष्ट्रीय अग्निशिमन सेवा महाविद्यालय, नागपूर येथून B.E.Fire Engg. उत्तीर्ण किंवा राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचेकडील Divisional Fire Officer पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकीमधील प्रगत पदविका) किंवा The Institution of Fire Engineers (U.K.) किंवा (India) या संस्थेकडील सदस्यत्व (M.I.Fire) किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर (The Institution of Fire Engineers (U.K.) यांचे सदस्यत्व प्राप्त करणे आवश्यक |
| ८६ | उप अग्निशमन केंद्र अधिकारी (सब फायर ऑफीसर)<br>(गट-क अग्निशमन सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा-२५% | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी.<br>ब) राष्ट्रीय/राज्य अग्निशमन सेवा महाविद्यालय यांच्याकडील Station Officer & Instructor पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकीमधील पदविका) उत्तीर्ण असावा किंवा राष्ट्रीय/राज्य अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन यांचा १ वर्ष कालावधीचा उप स्थानक अधिकारी व अग्निप्रतिबंधक अधिकारी हा पाठ्यक्रम पूर्ण केलेला असावा किंवा The Institution of Fire Engineers (U.K.) किंवा (India) या संस्थेकडून Grade-I ही पदवी प्राप्त केलेली असावी किंवा राष्ट्रीय/राज्य अग्निशमन सेवा महाविद्यालय |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | यांच्याकडील पदवी (B.E. Fire) धारण केलेली असावी किंवा राष्ट्रीय/राज्य अग्निशमन सेवा महाविद्यालय यांच्याकडील Divisional Fire Officer पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकीमधील पदविका) धारण केलेली असावा किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर The Institution of Fire Engineers (U.K.) यांचे सदस्यत्व प्राप्त केलेले असावे.<br>क) शासकीय/निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये अग्निशमन प्रणेता (Leading Fireman)/चालक-यंत्रचालक (Driver Operator) किंवा समकक्ष पदाचा किमान ३ वर्षांचा अनुभव आवश्यक.<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>इ) **शारीरिक पात्रता:-**<br>१) उंची १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची १५७ सें.मी.)<br>२) छाती- साधारण ८१ सें.मी. फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही.)<br>३) वजन- ५० कि.ग्रॅ. (महिला उमेदवारांचे वजन किमान ४६ कि.ग्रॅ.)<br>४)दृष्टी -चांगली (विना चष्म्याने दृष्टी-६/६ तसेच Ishihara Chart नुसार रंगदृष्टी चांगली).<br>फ) **वयोमर्यादा:-**<br>उमेदवाराचे वय ४० वर्षांपेक्षा जास्त असू नये. |
| | | पदोन्नती-७५% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशमन प्रणेता (Leading Fireman) या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या किंवा चालक-यंत्रचालक (Driver |

| **अ. क्र.** | **पदनाम व श्रेणी** | **नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती)** | **नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती** |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | Operator) या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे अनुक्रमे ५०:५० या प्रमाणात प्रमुख अग्निशामक (Leading Fireman) व चालक-यंत्रचालक (Driver Operator) यांची पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ८७ | अग्निशमन प्रणेता<br>(लिडींग फायरमन)<br>(गट-क, अग्निशमन सेवा) | नामनिर्देशन/<br>सरळसेवा-२५% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत परीक्षा (S.S.C.) उत्तीर्ण.<br>ब) राष्ट्रीय/राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र/महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी यांचा ६ महिने कालावधीचा अग्निशमन प्रशिक्षण पाठ्यक्रम/प्रगत पाठ्यक्रम (Advance Course) पूर्ण करणे आवश्यक.<br>क) शासकीय/निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्थेमध्ये अग्निशामक (Fireman) या पदावर किमान ३ वर्षे कामाचा अनुभव आवश्यक.<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>ड) **शारीरिक पात्रता:-**<br>१) उंची १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची १५७ सें.मी.)<br>२) छाती- साधारण ८१ सें.मी. फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही.)<br>३) वजन- ५० कि.ग्रॅ. (महिला उमेदवारांचे वजन- किमान ४६ कि.ग्रॅ.)<br>४) दृष्टी- चांगली. (विना चष्म्याने दृष्टी-६/६ तसेच Ishihara Chart नुसार रंगदृष्टी चांगली).<br>इ) **वयोमर्यादा:-**<br>उमेदवाराचे वय ३० वर्षांपेक्षा जास्त असू नये. |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | (शासन नियमानुसार जोखीमभत्ता व युनिफॉर्म अपकीप) |
| | | पदोन्नती-७५% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशामक या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या व वैध जड वाहन चालविण्याचा परवाना व अनुभव असणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>(शासन नियमानुसार जोखीमभत्ता व युनिफॉर्म अपकीप) |
| ८८ | चालक यंत्रचालक (ड्रायव्हर ऑपरेटर / जेसीबी ऑपरेटर)<br>(गट-क, अग्निशमन सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा-२५% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत परीक्षा (S.S.C.) उत्तीर्ण.<br>ब) राष्ट्रीय/राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र/महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी यांचा ६ महिने कालावधीचा अग्निशमन प्रशिक्षण पाठ्यक्रम/प्रगत पाठ्यक्रम (Advance Course) पूर्ण करणे आवश्यक.<br>क) वैध जड वाहन चालविण्याचा परवाना आवश्यक.<br>ड) जड वाहन चालक म्हणून ३ वर्षे काम केल्याचा अनुभव असणे आवश्यक.<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>फ) **शारीरिक पात्रता:-**<br>१) उंची १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची १५७ सें.मी.)<br>२) छाती- साधारण ८१ सें.मी. फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही.)<br>३) वजन- ५० कि.ग्रॅ. (महिला उमेदवारांचे वजन- किमान ४६ कि.ग्रॅ.)<br>४) दृष्टी- चांगली. (विना चष्म्याने दृष्टी-६/६ तसेच Ishihara Chart नुसार रंगदृष्टी चांगली). |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | ग) **वयोमर्यादा:-**<br>उमेदवाराचे वय ३० वर्षांपेक्षा जास्त असू नये. |
| | | पदोन्नती-७५% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशामक या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या व वैध जड वाहन चालविण्याचा परवाना तसेच मनपा आस्थापनेवरील जेसीबी चालविण्याचा अनुभव असणाऱ्या कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>(शासन नियमानुसार जोखीमभत्ता व युनिफॉर्म अपकीप) |
| ८९ | अग्निशामक (फायरमन) (गट-क, अग्निशमन सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा-१००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत परीक्षा (S.S.C.) उत्तीर्ण.<br>ब) राष्ट्रीय/राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र/महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी यांचा ६ महिने कालावधीचा अग्निशमन प्रशिक्षण पाठ्यक्रम/प्रगत पाठ्यक्रम (Advance Course) पूर्ण.<br>क) माजी सैनिकांना त्यांचेकडे उपलब्ध असलेल्या १२ दिवस ते ३० दिवसाच्या प्रशिक्षण प्रमाणपत्राच्या आधारे त्यांना नियुक्ती देण्यास पात्र ठरवून त्यांना राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्रात ६ महिन्यांचे प्रशिक्षण देण्यात यावे व समाधानकारक प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतरच त्यांना नियुक्ती देण्यात यावी.<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>इ) शारीरिक पात्रता:-<br>१) उंची १६५ सें.मी. (महिला उमेदवारांची उंची १५७ सें.मी.)<br>२) छाती- साधारण ८१ सें.मी. फुगवून-५ सें.मी. जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | नाही.)<br>३) वजन- ५० कि.ग्रॅ. (महिला उमेदवारांचे वजन- किमान ४६ कि.ग्रॅ.)<br>४) दृष्टी- चांगली. (विना चष्म्याने दृष्टी-६/६ तसेच Ishihara Chart नुसार रंगदृष्टी चांगली).<br>फ) वयोमर्यादा:-<br>उमेदवाराचे वय ३० वर्षांपेक्षा जास्त असू नये.<br>(शासन नियमानुसार जोखीमभत्ता व युनिफॉर्म अपकीप) |
| | | **१८.आपत्ती व्यवस्थापन विभाग** | |
| ९० | आपत्ती व्यवस्थापन अधिकारी (गट-ब, आपत्ती व्यवस्थापन सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा १००% | १. कोणत्याही शाखेची मान्यता प्राप्त विद्यापीठाची पदवी.<br>२. मान्यता प्राप्त विद्यापीठाची आपत्ती व्यवस्थापन विषयामधील पदव्युत्तर पदवी असल्यास प्राधान्य.<br>३. शासकीय/निमशासकीय/स्थानिक संस्थामधील/मोठ्या औद्योगिक संस्थेतील आपत्ती व्यवस्थापन नियंत्रण कक्षात किमान सात वर्ष कामाचा अनुभव.<br>४. एम.एस.सी.आय.टी. किंवा तत्सम समकक्ष परिक्षा उत्तीर्ण प्रमाणपत्र.<br>५. आपत्ती व्यवस्थापनात विशेष काम करणा-यास प्राधान्य. |
| | | **१९.शिक्षण विभाग** | |
| ९१ | शिक्षणाधिकारी (गट-अ, १ शिक्षण सेवा) | प्रतिनियुक्ती १००% | राज्य शासनाच्या शिक्षण सेवेतील किमान ०३ वर्षाचा अनुभव असणाऱ्या गट-अ दर्जाचे शिक्षण अधिकाऱ्यांमधून प्रचलित धोरणानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ९२ | मुख्याध्यापक (गट-ब शिक्षक सेवा) | पदोन्नती-१००% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील नियमित प्राथमिक शिक्षक या पदावर किमान ३ वर्षांची सेवा पूर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या |

| अ. क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/ प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| | | | आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| ९३ | पदवीधर शिक्षक (प्राथमिक) (मराठी/ऊर्दू) (गट-ब शिक्षक सेवा) | पदोन्नती-१००% | नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील नियमित सहशिक्षक (प्राथमिक) (मराठी/ऊर्दू) या पदावर किमान ३ वर्षांची सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी धारण करणाऱ्या शिक्षकाची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |
| ९४ | सह शिक्षक (प्राथमिक) (मराठी/ऊर्दू) (गट-क शिक्षक सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा-१००% | १. मान्यता प्राप्त विद्यापीठाची पदवी.<br>२. शासन मान्यता प्राप्त संस्थेकडून डी.एड./बी.एड. अभ्यासक्रम उत्तीर्ण आवश्यक.<br>३. टी.ई.टी.परिक्षा उत्तीर्ण (शासनाने यामध्ये बदल केल्यास तो यापुढे लागू राहील).<br>४. मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: CN = VIDYA RAMAPPA HAMPAYYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.11 20:04:20 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

oooooooo

## परिशिष्ट-(३)

## <u>नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका कर्मचाऱ्यांसाठी विभागीय परीक्षा नियम, २०२४</u>

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम (सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक-५९) च्या कलम-४६५, पोटकलम-(१) खंड (ल) च्या तरतुदींनुसार नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेसाठी केलेले नियम:-

### <u>नियम</u>

१. <u>संक्षिप्त शीर्षक व नियम लागू होण्याचा दिनांक</u>:-

**(अ)** या नियमास "नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका कर्मचाऱ्यांसाठी (अर्हताकारी विभागीय परीक्षा) नियम, २०२४" असे संबोधण्यात येईल.

**(ब)** **शासन राजपत्रात** प्रसिद्ध होतील, त्या तारखेपासून हे नियम अंमलात येतील.

२. <u>व्याख्या</u>:- विषयांत किंवा संदर्भानुसार अन्य अर्थ अभिप्रेत नसल्यास या नियमानुसार,

**(२.१)** "अधिनियम" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९

**(२.२)** "महानगरपालिका" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या तरतुदी अन्वये निर्माण केलेली "नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका."

**(२.३)** "आयुक्त" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम-३६ अन्वये शासनाने नियुक्त केलेला अधिकारी.

**(२.४)** "कर्मचारी" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील प्रकरण-४, कलम-५१ (४) अन्वये नेमणूक केलेले अधिकारी/कर्मचारी. परंतु, यात रोजंदारीवर, हजेरीपटावर असलेले कामगार आणि कंत्राटी पद्धतीने तसेच, अंशकालीन व मानद स्वरुपी नेमण्यात आलेल्या व्यक्तींचा समावेश होत नाही.

**(२.५)** "परिशिष्ट" म्हणजे, या नियमांना जोडलेले परिशिष्ट.

**(२.६)** "विभागीय परीक्षा" म्हणजे, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी विहित केलेली व या नियमांच्या परिशिष्ट-(३) (अ), परिशिष्ट-(३) (ब) व परिशिष्ट-(३) (क) मध्ये नमूद करण्यात आलेली विभागीय परीक्षा.

ज्या शब्दांची वा शब्दसमुहांची व्याख्या या नियमांत समाविष्ट करण्यात आली नसेल, त्यांचा अर्थ अधिनियमात ते ज्या अर्थाने वापरले असतील तसा समजण्यात येईल.

## ३. <u>विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य</u>:-

(३.१) हे नियम अस्तित्वात आल्याच्या तारखेस नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका आस्थापनेवरील स्थायी/अस्थायी स्वरुपात कोणत्याही पदावर नियुक्त असलेल्या व त्या तारखेनंतर नियुक्त होणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना परिशिष्ट-(३) च्या (ब) व (क) मध्ये विहित केलेली आवश्यक ती विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य असेल.

(३.२) उपरोक्त परिशिष्ट-(३) (अ) मध्ये ज्या संवर्गाचा उल्लेख आलेला नसेल, त्या संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या तांत्रिक ज्ञानाची लेखी व तोंडी परीक्षा आयुक्तांच्या मान्यतेने घेतली जाईल. याकरिता किमान तीस दिवसांपेक्षा कमी नाही एवढ्या कालावधीची पुर्वसूचना संबंधितांस देण्यात येईल.

## ४. <u>कालावधी आणि संधीची संख्या</u>:-

(४.१) **शासन राजपत्राच्या** दिनांकापूर्वी नियुक्त केलेल्या व्यक्तींकरिता कालावधी व संधीची संख्या या नियमांच्या अधीन राहून, **शासन राजपत्राच्या** दिनांकापूर्वी महानगरपालिका कर्मचारी म्हणून नियुक्त झालेल्या व सध्या अस्तित्वात असलेल्या नियमान्वये परीक्षा उत्तीर्ण न झालेल्या व्यक्तीने, तिला परीक्षा उत्तीर्ण होण्यामधून नियम-१० अन्वये सूट दिलेली नसेल, तर **शासन राजपत्राच्या** दिनांकापासून ३ वर्षांच्या आत व २ संधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

(४.२) नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२४ नुसार नियुक्त कर्मचाऱ्यांनी त्यांची नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून ४ वर्षात ३ संधीमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

## ५. <u>परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी मानक</u>:-

(५.१) नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेतर्फे आयोजित केल्या जाणाऱ्या परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी प्रत्येक प्रश्नपत्रिकेच्या एकूण गुणांच्या किमान **४०%** गुण प्राप्त करणे आवश्यक राहील.

(५.२) प्रत्येक संवर्गासाठी विहित करण्यात आलेल्या सर्व विषयांत वरील तरतुदीच्या आधारे एक वा एकापेक्षा अधिक संधीत उत्तीर्ण झाल्यावरच विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे समजण्यात येईल.

## ६. <u>परीक्षेचे वेळापत्रक</u>:-

सक्षम प्राधिकारी यांनी विहित केलेल्या प्रशासन/अभिकरणाकडून दरवर्षी प्रशासनाच्या/ अभिकरणाच्या सोयीनुसार विभागीय परीक्षा व मराठी भाषा परीक्षा मे ते जून महिन्यात घेतल्या जातील. तसेच परीक्षेचे आयोजन वर्षातून किती वेळा करावे व एकपेक्षा अधिक वेळा करावयाचे असल्यास त्याबाबतचे वेळापत्रक व विभागीय परीक्षा प्रक्रिया याबाबत सक्षम प्राधिकारी निर्णय घेईल.

**७. <u>परीक्षेचा अभ्यासक्रम</u>:-**

विभागीय परीक्षांसाठीचा अभ्यासक्रम परिशिष्ट-(३) (ब) व परिशिष्ट-(क) मध्ये विहित केल्याप्रमाणे किंवा शासनाने वेळोवेळी विहित केल्यानुसार असेल.

परंतु, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण संस्था, नाशिक यांच्याकडून अभियांत्रिकी विभागातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी विहित केलेल्या परीक्षांसाठीचा अभ्यासक्रम त्या परीक्षा घेणाऱ्या प्राधिकाऱ्यांकडून जाहीर केल्याप्रमाणे असेल.

**८. <u>प्रशिक्षण</u>:-**

विभागीय परीक्षेस बसू इच्छिणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी परीक्षेपूर्वी किमान ४० तासांचा प्रशिक्षण कार्यक्रम नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेकडून आयोजित करण्यात येईल.

**९. <u>परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास होणारे परिणाम</u>:-**

एखादा कर्मचारी नियम-४ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या कालमर्यादित आणि संधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण झाला नाही तर पुढील परिणाम होतीलः

(९.१) तो परीक्षा उत्तीर्ण होईपर्यंत किंवा नियम-१० अन्वये परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्यास सूट मिळेपर्यंत, त्याला त्याच्या पदावर कायम करण्यात येणार नाही किंवा त्याच्या पदाच्या वेतनमानातील पुढील वेतनवाढ त्याला देण्यात येणार नाही. अशा रितीने रोखून ठेवलेली वेतनवाढ ही, तो परीक्षा उत्तीर्ण झाल्याच्या दिनांकापासून किंवा त्याला परीक्षा उत्तीर्ण होण्यामधून नियम-१० अन्वये सूट देण्यात आल्याच्या दिनांकापासून त्याला देय असेल आणि कोणतीही वेतनवाढ रोखून न धरल्याचे समजून पुढील सर्व वेतनवाढी देण्यात येतील. मात्र गतकाळातील थकबाकी अनुज्ञेय नसेल.

(९.२) त्याला त्या संवर्गातील आपली ज्येष्ठता गमवावी लागेल म्हणजेच जे कर्मचारी त्याच्या अगोदर परीक्षा उतीर्ण झाले असतील, त्या सर्व कर्मचाऱ्यांच्या नंतर त्याचा ज्येष्ठता क्रम लागेल. तसेच, अशा ज्या कर्मचाऱ्यांच्या नंतर त्याचा ज्येष्ठता क्रम लागेल, त्या कर्मचाऱ्यास ज्येष्ठ असणाऱ्या आणि त्याच्यानंतर, परंतु नियम-४ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या कालावधीत व संधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या देखील नंतरचा ज्येष्ठता क्रम त्याला देण्यात येईल.

**१०. <u>परीक्षा उत्तीर्ण होण्यामधून सूट</u>:-**

(१०.१) **शासन राजपत्राच्या** दिनांकापूर्वी नियुक्ती झालेल्या कर्मचाऱ्यास परीक्षा उत्तीर्ण होण्यामधून पुढील बाबतीत सूट देण्यात येईल:

(अ) त्यास यापूर्वीच कर्मचारी म्हणून कायम करण्यात आले असेल अशा प्रकरणी किंवा,

(ब) तो सध्या अस्तित्वात असलेल्या नियमान्वये यापूर्वीच परीक्षा उत्तीर्ण झाला असेल अशा प्रकरणी किंवा,

(१०.२) कोणत्याही दिनांकास कर्मचारी ४५ वर्षे वयाचा झाल्यानंतर त्यास परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येईल.

११. परीक्षा सर्वसाधारणपणे वर्षातून एकदा घेण्यात येईल. एखाद्या वर्षी जर कोणत्याही कारणास्तव परीक्षा घेण्यात आली नाही, तर कालावधी व संधीची गणना करताना कालावधी वगळण्यात येईल.

११. <u>विशेष योग्यता</u>:-

एखादा कर्मचारी पहिल्याचा प्रयत्नात परीक्षा उत्तीर्ण झाला असेल आणि त्याने कोणत्याही प्रश्नपत्रिकेत ७० टक्के किंवा त्याहून अधिक गुण मिळविले असतील तर त्या प्रश्नपत्रिकेतील त्याच्या विशेष योग्यतेबद्दलची नोंद गोपनीय अहवालात घेण्यात येईल.

१२. <u>विषयांमध्ये सूट</u>:-

जो उमेदवार परीक्षेमध्ये अनुत्तीर्ण झालेला आहे, परंतु ज्याने कोणत्याही प्रश्नपत्रिकेमध्ये ५५ टक्के किंवा अधिक गुण मिळविलेले आहेत, त्याला त्याच्या नंतरच्या प्रयत्नांमध्ये त्या विषयासाठी परीक्षेला बसण्यातून व उत्तीर्ण होण्यातून सूट देण्यात येईल.

१३. परीक्षा सर्वसाधारणपणे वर्षातून एकदा घेण्यात येईल. एखाद्या वर्षी जर कोणत्याही कारणास्तव परीक्षा घेण्यात आली नाही, तर कालावधी व संधीची गणना करताना कालावधी वगळण्यात येईल.

१४. <u>निर्वचनाच्या शक्ती</u>:-

नियमातील तरतुदींनुसार अधिकाऱ्यांच्या/कर्मचाऱ्यांच्या एखाद्या संवर्गास कोणती विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे वा कोणत्या संवर्गास ही परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट आहे, यासंबंधी तसेच विभागीय परीक्षेबाबत कोणताही विवाद उत्पन्न झाल्यास त्याबाबतचा आयुक्त यांचा निर्णय अंतिम असेल.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: CN = VIDYA RAMAPPA HAMPAYYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.11 20:04:39 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

ooooooo

परिशिष्ट-(३) (अ)
(नियम-३)

## विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य असलेले संवर्ग

| अ.क्र. | विभाग/सेवा | संवर्ग |
|---|---|---|
| १. | प्रशासकीय सेवा | अधिक्षक. |
| २. | लेखा/लेखा परीक्षण सेवा | लेखाधिकारी/ लेखापरीक्षक/ उप लेखापाल/ उप मुख्य लेखापरीक्षक |
| ३. | आरोग्य सेवा | स्वच्छता निरीक्षक |
| ४. | अग्निशमन सेवा | उप मुख्य अग्निशमन अधिकारी |

## महापालिकेव्यतिरिक्त इतर प्राधिकाऱ्याकडून घेतल्या जाणाऱ्या विहित विभागीय परीक्षा

| अ.क्र. | विभाग | परीक्षा घेणारा प्राधिकारी | संवर्ग |
|---|---|---|---|
| १. | अभियांत्रिकी स्थापत्य/ विद्युत/यांत्रिकी सेवा | अभियांत्रिकी अधिकारी महाविद्यालय, नाशिक | कनिष्ठ अभियंता/सहाय्यक अभियंता. |
| २. | अग्निशमन सेवा | अग्निशमन महाविद्यालय, नागपूर/ मुंबई | अग्निशमन विभागातील पदे. |

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: CN = VIDYA RAMAPPA HAMPAYYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.11 20:04:51 +05'30'

(विद्या हम्पय्या)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

ooooooo

## परिशिष्ट-(३) (ब)

## विभागीय परीक्षा

**प्रश्नपत्रिका-१** (गुण- १००, वेळ-३ तास)

१. सारांश लेखन.

२. टिप्पणी लेखन.

३. पत्र लेखन.

४. भाषांतर (इंग्रजीतून मराठीत).

---

**प्रश्नपत्रिका-२** (पुस्तकांसह) (गुण- १००, वेळ- ३ तास)

१. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम

२. किमान वेतन अधिनियम

३. माहितीचा अधिकार अधिनियम, २००५

४. महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५

५. महाराष्ट्र सार्वजनिक अभिलेख अधिनियम, २००५

६. महाराष्ट्र शासकीय कामकाजात विलंब करण्यास प्रतिबंध करण्याचा अधिनियम, २००५ चे प्रकरण क्र.३

७. महानगरपालिका वसूल करीत असलेले कर.

८. आपत्ती व्यवस्थापन.

---

**प्रश्नपत्रिका-३** (पुस्तकांसह) (गुण- १००, वेळ- ३ तास)

१) सर्व महाराष्ट्र नागरी सेवा नियम.

सेवेच्या सर्व साधारण शर्ती :-

रजा

वेतन

निवृत्ती वेतन

निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण

पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने

वर्तणूक आणि शिस्त व अपील

विभागीय चौकशी नियम पुस्तिका

२) रचना व कार्यपद्धती- सहा गठ्ठे पद्धती.

३) कार्यालयीन नियमपुस्तिका, जमाखर्च लेखा परीक्षा.

४) प्राथमिक हिशोब तपासणी.

---

**टीप:** या प्रश्नपत्रिकेचे माध्यम मराठी असेल व प्रश्नांची उत्तरे मराठी भाषेत द्यावी लागतील.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: CN = VIDYA RAMAPPA HAMPAYYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.11 20:05:05 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

ooooooo

**लेखा/लेखा परीक्षण विभागातील लेखापाल/लेखा परीक्षक यांना प्रश्नपत्रिका-१, २, ३ व्यतिरिक्त पुढे विहित करण्यात आलेल्या विषयांच्या परीक्षेत उत्तीर्ण व्हावे लागेल**

**प्रश्नपत्रिका-४** (पुस्तकांसह) (गुण- १००, वेळ- ३ तास)

१. मुंबई वित्तीय नियम, १९५९.
२. महाराष्ट्र अर्थ संकल्प नियम पुस्तिका प्रकरण क्र. ४,५,७,९ व १७ तसेच परिशिष्टे २, ४, ८, ९, ११ वगळून.
३. महाराष्ट्र सार्वजनिक खर्च नियमावली, १९६५ तसेच नियमावली, १९९२.
४. महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमावलीतील २,३,६,७,८,९,१०,११,१२-१ ते १२-५ प्रकरणे.
५. महानगरपालिकेच्या निविदेसाठीच्या सर्वसाधारण अटी व शर्ती.

---

**प्रश्नपत्रिका-५** (पुस्तकांसह) (गुण- १००, वेळ- ३ तास)

१. Book Keeping & Accountancy.
२. Accrual Based Double Entry Accounting
३. मुंबई प्राथमिक शिक्षण अधिनियम, १९४७
४. मुंबई प्राथमिक शिक्षण नियम, १९४९

---

**गट - क च्या कर्मचाऱ्यांना गट- ब च्या पदावर पदोन्नती मिळण्यापूर्वी या परिशिष्टातील प्रश्नपत्रिका-१, २ व ३ व्यतिरिक्त खालील प्रश्नपत्रिकेत उत्तीर्ण होणे आवश्यक असेल**

**प्रश्नपत्रिका-६** (पुस्तकांसह) (गुण- १००, वेळ- ३ तास)

१. महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६.
२. महानगरपालिका (घनकचरा व्यवस्थापन) उपविधी, २००२.
३. महाराष्ट्र (नागरी क्षेत्र) वृक्षांचे जतन अधिनियम, १९७५.
४. राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियान.
५. झोपडपट्टी सुधार समिती.
६. दिव्यांगांसाठीच्या शासनाच्या सवलती व योजना.
७. समाज विकास व बाल कल्याण संबंधीच्या शासनाच्या व महानगरपालिकेच्या योजना.

८. केंद्र व महाराष्ट्र शासनाच्या नगर विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजना.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: CN = VIDYA RAMAPPA HAMPAYYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.11 20:05:17 +05'30'

(विद्या हम्पय्या)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

ooooooo

**परिशिष्ट-(३) (क)**

**विभागीय परीक्षा (अग्निशमन)**

**विभाग-अग्निशमन**

**संवर्ग-अग्निशामक/ड्रायव्हर ऑपरेटर**

**तोंडी व प्रात्यक्षिक परीक्षा.:-** **(गुण- १००)**

| | | |
|---|---|---|
| १) | रासायनिक अग्निशामके | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| २) | शिड्या | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ३) | होज पाईप | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ४) | फोम व होम साधने | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ५) | हायड्रंट व होज फिटींग्ज | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ६) | पंप | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ७) | वॉटर रिले | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ८) | गाठी | - प्रकार, उपयोग, देखभाल व निगा |
| ९) | श्वसन उपकरणे | - साहित्याची नांवे व वापर |
| १०) | कवायत | - आज्ञापालन व सहकाऱ्याबरोबर कवायत करण्याची क्षमता |

**लेखी परीक्षा.:-** **(गुण- १००, वेळ- २ तास)**

**१)** प्रथमोपचार - प्रथमोपचार पेटीतील साहित्य व भाजणे, अस्थिभंग, घुसमटणे, रक्तस्त्राव, जखमा यांचेवर करावयाच्या प्रथमोपचाराची माहिती देणे.

**२)** वॉचरूम कार्यपद्धती - वॉचरुममध्ये ठेवल्या जाणाऱ्या रेकॉर्डची माहिती, त्यासाठी वापरली जाणारी कार्यपद्धती नमुने व काल्पनिक संदेशावर वॉचरुमच्या रेकॉर्डमध्ये नोंद करणे.

**३)** अग्निशामक व ड्रायव्हर- पदाच्या कर्तव्यांची माहिती असणे व ती कर्तव्य पार पाडण्यासाठी कराव्या लागणाऱ्या कामाबद्दलचा तपशील ड्रायव्हर ऑपरेटर पदाची कर्तव्ये.

**४)** शिस्त व कर्तव्य पालन- शिस्तीचे व कर्तव्य पालनाचे अग्निशमन विभागातील महत्व व त्यांचे पालन न झाल्यास होणारे परिणाम. कर्तव्य पालन न झाल्यामुळे वा झाल्यामुळे आठवणीत राहिलेल्या एखाद्या प्रसंगाचे वर्णन.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: CN = VIDYA RAMAPPA HAMPAYYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.11 20:05:28 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

ooooooo

## परिशिष्ट-(४)

## नामनिर्देशन/सरळसेवा भरती करताना अग्निशमन विभागासाठी निकष व गुणांकन पद्धती

### १. शैक्षणिक अर्हता व अनुभवः-

(१.१) अग्निशमन पदांसाठी शैक्षणिक अर्हता व अनुभव हा सदर नियमांच्या परिशिष्ट- (२) मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

(१.२) शारीरिक पात्रता:-

| पुरुष | महिला |
|---|---|
| • उंची - किमान १६५ सें.मी. (अनवाणी)<br>• छाती - न फुगविता ८१ सें.मी.<br>- फुगवून ८६ सें.मी. (किमान ५ सें.मी. फुगवणे आवश्यक.)<br>• वजन- ५० कि.ग्रॅ.<br>• दृष्टी- चांगली (विना चष्म्याने दृष्टी-६/६ तसेच IShihara Chart नुसार रंगदृष्टी चांगली). वर्णांधता आजारापासून मुक्त असावा.<br>• उमेदवार शारीरिक व मानसिकदृष्ट्या सुदृढ असावा. | • उंची - किमान १५७ सें.मी. (अनवाणी)<br>• छाती- महिला उमेदवारांसाठी लागू नाही.<br>• वजन - ४६ कि.ग्रॅ.<br>• दृष्टी- चांगली (विना चष्म्याने दृष्टी- ६/६ तसेच IShihara Chart नुसार रंगदृष्टी चांगली). वर्णांधता आजारापासून मुक्त असावा.<br>• उमेदवार शारीरिक व मानसिकदृष्ट्या सुदृढ असावा. |

### २. परीक्षेचे टप्पे:-

प्रस्तुत परीक्षा एकूण दोन टप्प्यात घेण्यात येईल:-
(१) लेखी परीक्षा-१०० गुण. (२) शारीरिक चाचणी-१०० गुण.

(२.१) लेखी परीक्षा:-

(१) लेखी परीक्षा (तांत्रिक/सामान्यज्ञान) १०० गुणांची असेल.
(२) लेखी परीक्षेसाठी उमेदवाराकडे सेवा भरती नियमात नमूद शैक्षणिक पात्रता/तांत्रिक शिक्षणाची अर्हता तसेच शारीरिक क्षमता असणे आवश्यक राहील.
(३) जाहिरातीस असणारा एकूण प्रतिसाद विचारात घेऊन आवश्यक तेवढ्या (साधारणत: १:५ किंवा १:७ या प्रमाणात) उमेदवारांना शारीरिक चाचणी परीक्षेस पात्र ठरविण्यात येईल.
(४) लेखी परीक्षेकरिता विहित केलेले किमान गुण प्राप्त करणारे उमेदवार शारीरिक चाचणीसाठी पात्र ठरतील.

(२.२) मैदानी चाचणी (पुरुषांसाठी) (१०० गुण)

(अ) १६०० मीटर धावणे (३० गुण)

| १६०० मी. अंतर पूर्ण करण्यास लागलेला कालावधी | द्यावयाचे गुण |
|---|---|
| ५ मि. १० सेकंद किंवा त्यापेक्षा कमी. | ३० |
| ५ मि. १० सेकंदापेक्षा जास्त परंतु ५ मि. ३० सेकंद किंवा त्यापेक्षा कमी. | २७ |
| ५ मि. ३० सेकंदापेक्षा जास्त परंतु ५ मि. ५० सेकंद किंवा त्यापेक्षा कमी. | २४ |
| ५ मि. ५० सेकंदापेक्षा जास्त परंतु ६ मि. १० सेकंद किंवा त्यापेक्षा कमी. | २१ |
| ६ मि. १० सेकंदापेक्षा जास्त परंतु ६ मि. ३० सेकंद किंवा त्यापेक्षा कमी. | १८ |
| ६ मि. ३० सेकंदापेक्षा जास्त परंतु ६ मि. ५० सेकंद किंवा त्यापेक्षा कमी. | १५ |
| ६ मि. ५० सेकंदापेक्षा जास्त परंतु ७ मि. १० सेकंद किंवा त्यापेक्षा कमी. | १० |
| ७ मि. १० सेकंदापेक्षा जास्त परंतु ७ मि. ३० सेकंदापेक्षा कमी. | ०५ |
| ७ मि. ३० सेकंदापेक्षा जास्त | ०० |

**(ब)** जमिनीपासून ३३ फुट उंचीवरील खिडकीस लावलेल्या (४६.४॰ वरील उंचीच्या) ॲल्युमिनियम एक्सटेन्शन शिडीवर खिडकीपर्यंत वर चढून त्याच शिडीने खाली उतरणे.(आरंभ रेषेपासून शिडी २० फुट अंतरावर असेल.) **(२० गुण)**

| वेळ (सेकंदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| २० सेकंदापर्यंत | २० |
| २० सेकंदापेक्षा जास्त ते २५ सेकंदापर्यंत | १६ |
| २५ सेकंदापेक्षा जास्त ते ३० सेकंदापर्यंत | १२ |
| ३० सेकंदापेक्षा जास्त ते ३५ सेकंदापर्यंत | ०८ |
| ३५ सेकंदापेक्षा जास्त ते ४० सेकंदापर्यंत | ०४ |
| ४० सेकंदापेक्षा जास्त | ०० |

**(क) ५० कि.ग्रॅ. वजनाची मानवीय प्रतिकृती खांद्यावर घेऊन दिलेल्या चौकोनी मार्गाने ६० मीटर अंतर धावणे– (२० गुण)**

| वेळ (सेकंदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| २० सेकंदापर्यंत | २० |

| वेळ (सेकंदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| २० सेकंदापेक्षा जास्त ते २५ सेकंदापर्यंत | १६ |
| २५ सेकंदापेक्षा जास्त ते ३० सेकंदापर्यंत | १२ |
| ३० सेकंदापेक्षा जास्त ते ३५ सेकंदापर्यंत | ०८ |
| ३५ सेकंदापेक्षा जास्त ते ४० सेकंदापर्यंत | ०४ |
| ४० सेकंदापेक्षा जास्त | ०० |

(ड) <u>२० फुट उंचीपर्यंत रस्सीवर चढणे व उतरणे</u>. (२० गुण)

रस्सी पूर्ण चढल्यास २० गुण, ३/४ (तीन चतुर्थांश) चढल्यास १० गुण, १/२ (अर्धी) चढल्यास ५ गुण तर अर्ध्यापेक्षा कमी अंतर चढल्यास शून्य गुण दिले जातील. (रस्सीवर चढतेवेळी फक्त हाताचा वापर करणे बंधनकारक राहील. पायाचा वापर करता येणार नाही, केल्यास शून्य गुण मिळतील.)

(इ) <u>२० पुल-अप्स</u> (१० गुण)

प्रत्येक पुल-अपला १/२ (अर्धा) गुण, याप्रमाणे २० पुल-अप्स पूर्ण केल्यास १० गुण देण्यात येतील.

(२.३) <u>मैदानी चाचणी- महिलांसाठी</u> (१०० गुण)

(अ) <u>८०० मीटर धावणे</u> (३० गुण)

| ८०० मी. अंतर पूर्ण करण्यास लागलेला कालावधी | द्यावयाचे गुण |
|---|---|
| २ मि. ५० सेकंदापर्यंत | ३० |
| २ मि. ५० सेकंदापेक्षा जास्त ते ३ मि. ०० सेकंदापर्यंत | २७ |
| ३ मि. ०० सेकंदापेक्षा जास्त ते ३ मि. १० सेकंदापर्यंत | २४ |
| ३ मि. १० सेकंदापेक्षा जास्त ते ३ मि. २० सेकंदापर्यंत | २१ |
| ३ मि. २० सेकंदापेक्षा जास्त ते ३ मि. ३० सेकंदापर्यंत | १८ |
| ३ मि. ३० सेकंदापेक्षा जास्त ते ३ मि. ४० सेकंदापर्यंत | १५ |
| ३ मि. ४० सेकंदापेक्षा जास्त ते ३ मि. ५० सेकंदापर्यंत | १० |
| ३ मि. ५० सेकंदापेक्षा जास्त ते ४ मि. ०० सेकंदापर्यंत | ०५ |
| ४ मि. ०० सेकंदापेक्षा जास्त | ०० |

(ब) जमिनीपासून ३३ फुट उंचीवरील खिडकीस लावलेल्या (४६.४° वरील उंचीच्या) ॲल्युमिनियम एक्सटेन्शन शिडीवर खिडकीपर्यंत वर चढून त्याच शिडीने खाली उतरणे. (२० गुण)

(आरंभ रेषेपासून शिडी २० फुट अंतरावर असेल.)

| वेळ (सेकंदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| ३० सेकंदापर्यंत | २० |
| ३० सेकंदापेक्षा जास्त ते ४० सेकंदापर्यंत | १५ |
| ४० सेकंदापेक्षा जास्त ते ५० सेकंदापर्यंत | १० |
| ५० सेकंदापेक्षा जास्त ते ६० सेकंदापर्यंत | ०५ |
| ६० सेकंदापेक्षा जास्त | ० |

(क) ४० कि.ग्रॅ. वजनाची मानवाकृती खांद्यावर घेऊन दिलेल्या चौकोनी मार्गाने ६० मीटर अंतर धावणे. (२० गुण)

| वेळ (सेकंदामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| २५ सेकंदापर्यंत | २० |
| २५ सेकंदापेक्षा जास्त ते ३० सेकंदापर्यंत | १६ |
| ३० सेकंदापेक्षा जास्त ते ३५ सेकंदापर्यंत | १२ |
| ३५ सेकंदापेक्षा जास्त ते ४० सेकंदापर्यंत | ०८ |
| ४० सेकंदापेक्षा जास्त ते ४५ सेकंदापर्यंत | ०४ |
| ४५ सेकंदापेक्षा जास्त | ० |

(ड) गोळा फेक (गोळ्याचे वजन ४ कि.ग्रॅ.) (१० गुण)

| गोळा फेकीचे अंतर (मीटरमध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| ६ मीटर व त्यापेक्षा जास्त | १० |
| ५.५० मीटर ते ६ मीटरपेक्षा कमी | ०८ |
| ५ मीटर ते ५.५० मीटरपेक्षा कमी | ०६ |
| ४.५० मीटर ते ५ मीटरपेक्षा कमी | ०४ |
| ४ मीटर ते ४.५० मीटरपेक्षा कमी | ०२ |
| ४ मीटरपेक्षा कमी | ० |

(इ) लांब उडी (१० गुण)

| अंतर (फुटामध्ये) | द्यावयाचे गुण |
|---|---|
| १५ फुट व त्यापेक्षा जास्त | १० |
| १३ फुट ते १५ फुटापेक्षा कमी | ०८ |
| ११ फुट ते १३ फुटापेक्षा कमी | ०६ |
| ०९ फुट ते ११ फुटापेक्षा कमी | ०४ |
| ०९ फुटापेक्षा कमी | ० |

(फ) १० पुश अप (जोर काढणे) (१० गुण)

प्रत्येक १ पुश अपला १ गुण, याप्रमाणे १० पुश अप पूर्ण केल्यास १० गुण देण्यात येतील.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: CN = VIDYA RAMAPPA HAMPAYYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.11 20:05:45 +05'30'

( विद्या हम्पय्या)
शासनाचे उप सचिव.

ooooooo